शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून राज्यात व्यावसायिक पदवी, पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था सुरु करण्यास अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शासन मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. टीईएम-२०१८/प्र.क्र.२४५/तांशि-४**
शिबीर कार्यालय, हैद्राबाद हाऊस, सिव्हील लाईन, नागपूर.
दिनांक: १९ जुलै, २०१८

वाचा : १) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक २/एनजीसी/मान्यता/२०१८/७३४, दिनांक १४.०६.२०१८.
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक २अ/एनडीएम/२०१८/७९८, दिनांक २०.०६.२०१८.

**प्रस्तावना :-**

शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मध्ये अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचेकडून अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे (महाराष्ट्र शासनाची स्वायत्त संस्था) या संस्थेतील Masters in Town and Country Planning आणि Bachelors in Planning अभ्यासक्रमास मान्यता देण्यात आली आहे. परिषदेने दिनांक ७/५/२०१८ आणि १४/५/२०१८ रोजीच्या ई-मेल व्दारे कळविलेल्या यादीनुसार सदर संस्थेचे उपरोक्त अभ्यासक्रम Engineering & Technology अंतर्गत समाविष्ट होते. मात्र दिनांक ८/६/२०१८ रोजी परिषदेने मान्यता दिलेल्या यादीत सदरहू दोन्ही अभ्यासक्रम Engineering & Technology ऐवजी Planning अंतर्गत दर्शविण्यात आलेले आहेत. त्यानुसार तंत्र शिक्षण संचालनालयाने दिनांक १४/६/२०१८ च्या पत्राव्दारे अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या राज्य शासनाच्या स्वायत्त संस्थेतील Masters in Town and Country Planning आणि Bachelors in Planning अभ्यासक्रमास शासन मान्यता देण्याबाबत प्रस्ताव सादर केलेला आहे.

२. संचालकांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संसथेत नवीन पदवी/ पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाचे महाविद्यालय सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्याबाबत शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेत Masters in Town and Country Planning आणि Bachelors in Planning हे अभ्यासक्रम Engineering & Technology ऐवजी Planning अंतर्गत

शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून सुरु करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

१) सदर मंजूरी यापूर्वी अभ्यासक्रमास मंजूरी देताना विहित केलल्या अटी व शर्तीच्या अधीन राहिल.

२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे,१९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी आवश्यकतेनुसार संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम,२०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५) संबंधित संस्थेने संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६) सदर पदवी व पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार / पध्दतीनुसार करण्यात येतील.

७) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूट (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्ण वेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा.प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०) रॅगिंग संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

११) याशिवाय संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१२) ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतिम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

२. वर नमूद केलेल्या अभ्यासक्रमांचा अंतर्भाव शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करीता सुरु असलेल्या केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेमध्ये करणे शक्य नसल्यने अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेच्या उपरोक्त नमूद दोन अभ्यासक्रमांची प्रवेश प्रक्रिया शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पुरती केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेव्दारे न राबविता संस्था स्तरावरुन खालील अटींच्या अधीन राहून राबविण्यात यावी:-

(१) शासन निर्णय्, क्रमांक टीईएम-२०१६/प्र.क्र.४७३/१६/तांशि-४, दिनांक २५ एप्रिल, २०१७ मधील प्रथम वर्ष पदवी/ पदव्युत्तर पदवी प्रवेशासाठी विहित केलेल्या अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.
(२) अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेली पात्रता विचरात घेऊन प्रवेश प्रक्रिया राबविण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७१९१६०११३४७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.07.20 14:59:36 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय(संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
३. संबंधित विद्यापीठांचे कुलसचिव, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
४. अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली- ११० ००१.
८. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली.
९. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई
१०. निवड नस्ती/तांशि-४.